**सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, मुंबई, नागपूर, पुणे व नाशिक येथे १४ अधिकच्या पदांची निर्मिती करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक भानिका-२०१६/प्र.क्र.४५/गृनिधो-१**
नविन प्रशासन भवन, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ ऑगस्ट, २०१७.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र भाडे नियंत्रण अधिनियम, १९९९ अंतर्गत येणा-या घरमालक व भाडेकरु यांच्यातील कोणत्याही वादावर न्यायनिर्णय देण्याकरिता अधिनियमाच्या कलम ४० च्या तरतुदीनुसार सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण अधिनियम यांची राज्यात कोकण, पुणे, नाशिक व नागपूर अशी ४ कार्यालये निर्माण करण्यात आलेली आहे.

२. सद्य:स्थिती उपरोक्त ४ कार्यालयात सक्षम प्राधिकारी ह्या पदाव्यतिरिक्त एकूण १६ पदे मंजूर आहेत. भाडे नियंत्रण अधिनियम अंतर्गत स्थापित कार्यालयांच्या सक्षमीकरण्याबाबत मा. उच्च न्यायालयामध्ये श्री. संजय जगताप विरुध्द महाराष्ट्र शासन रिट याचिका क्र. ५१८८/२०१४ दाखल करण्यात आलेली आहे. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने भाडे नियंत्रण कायद्याची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी कायद्यातील कलम ५७ अंतर्गत नियम बनविणे, राज्यातील सर्व सक्षम प्राधिकरणांच्या पदांच्या नियमित नियुक्त्या होण्याकरीता नियम तयार करणे, किमान कर्मचारी वृंद व कार्यालयात मूलभूत व इतर सुविधा पुरविणे यासाठी शासन स्तरावर कार्यवाही होणे अपेक्षित असल्याचे आदेश पारीत करुन प्रत्येक सक्षम प्राधिका-यांच्या कार्यालयात नवीन पद निर्मिती करुन कर्मचारी वृंद उपलब्ध करुन देणेबाबत निदेश दिले आहेत. त्याअनुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १९ मे, २०१७ रोजी झालेल्या उच्च स्तरीय समितीच्या बैठकीत नवीन अधिकची पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार प्रत्येक सक्षम प्राधिका-यांच्या कार्यालयात नवीन पद निर्मिती करुन कर्मचारी वृंद उपलब्ध करण्यासाठी मुंबई, नागपूर, पुणे व नाशिक येथे अधिक्षक १ पद, निम्नश्रेणी लघुलेखक १ पद, लिपिक ७ पदे, प्रोसेस सर्व्हर ४ पदे, शिपाई १ पद अशी खालीलप्रमाणे ४ कार्यालयात एकूण १४ पदे निर्माण करण्यात येत असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## कोकण विभाग

| अ.क्र. | पदनांम | वेतनश्रेणी | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | २ |
| २ | प्रोसेस सर्व्हर | ५२००-२०२०० + ग्रेड पे २८०० | १ |
| एकूण | | | ३ |

## नागपूर विभाग

| अ.क्र. | पदनांम | वेतनश्रेणी | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | अधिक्षक (वर्ग-२) | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० | १ |
| २ | निम्नश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० | १ |
| ३ | लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | १ |
| ४ | शिपाई | ४४४०-७४४० + ग्रेड पे १३०० | १ |
| ५ | प्रोसेस सर्व्हर | ५२००-२०२०० + ग्रेड पे २८०० | १ |
| एकूण | | | ५ |

## पुणे विभाग

| अ.क्र. | पदनांम | वेतनश्रेणी रुपये | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | २ |
| २ | प्रोसेस सर्व्हर | ५२००-२०२०० + ग्रेड पे २८०० | १ |
| एकूण | | | ३ |

## नाशिक विभाग

| अ.क्र. | पदनांम | वेतनश्रेणी रुपये | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | २ |
| २ | प्रोसेस सर्व्हर | ५२००-२०२०० + ग्रेड पे २८०० | १ |
| एकूण | | | ३ |

२. सदर पदांचा वेतन व भत्यावरील खर्च हा “मागणी क्रमांक क्यू-२, लेखा शिर्ष २०७०-इतर प्रशासनिक सेवा, ८०० इतर खर्च (००) (००) (०२) मुंबई भाडे नियंत्रण अधिनियमाखालील सक्षम प्राधिका-यांच्या आस्थापनेचे कार्यालय (दत्तमत) (२०७० ०५१२)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय हा उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक १९ मे, २०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार तसेच वित्त विभागाच्या अ.नौ.सं.क्र.३५०/आ.पु.क., दिनांक १० जुलै, २०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०१७०८१११४३९५८२००९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramchandra Dhanawade

Digitally signed by Ramchandra Dhanawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf4fd1e4249e6612552db1552e149b0688899cac7ecc37ca9fbf60ec7d9103d6, cn=Ramchandra Dhanawade
Date: 2017.08.11 14:30:49 +05'30'

**( रा. कों. धनावडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
३) खाजगी सचिव, मा. मंत्री (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई
४) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई
५) खाजगी सचिव, मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) खाजगी सचिव, मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
८) महालेखापाल १ / २, ( लेखापरीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) महालेखापाल १ / २, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१०) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण विभाग, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई
११) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर
१२) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, गृहनिर्माण भवन, आगरकर नगर, अलंकार सिनेमाजवळ, पुणे
१३) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नाशिक विभाग, जुने महसूल आयुक्त कार्यालय, बॅरेक्स क्रमांक ९, नाशिक रोड, नाशिक
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१६) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
१७) उप कोषागार अधिकारी, वाशी, नवी मुंबई
१८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / पुणे / नाशिक
१९) कक्ष अधिकारी (१४-अ/१९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) कक्ष अधिकारी (सेवा-९ / व्यय-३ / आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबइ
२१) निवडनस्ती (गृनिधो-१)